कोविड-१९ उपाययोजनांतर्गत औषधे/सर्जिकल साहित्य, चाचणी किट्स या बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कोविड-२०२१/प्र.क्र.२११/प्रशासन-२**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार
गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला, मंत्रालय, मुंबई
तारीख: ३१ मार्च २०२२.

वाचा:-

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दि. १७.०४.२०१५
२) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांकः संकिर्ण-२०१४/प्र.क्र.१७८/प्रशासन-२, दि. ०६.०२.२०१५
३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/जीवनावश्यक व जीवरक्षक औषधे/प्रमा/३६४६/२०२२, दि. ३१.०३.२०२२.
४) शासन निर्णय समक्रमांकः दिनांक ३०.०७.२०२१.
५) शासन निर्णय समक्रमांकः दिनांक १३.१०.२०२१.
६) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांकः कोविड-२०२१/प्र.क्र.१७७/प्रशासन-२, दि. ०९.०८.२०२१

**प्रस्तावना:-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या २२१०-३३१४ या लेखाशिर्षाखाली (२१) सामुग्री व पुरवठा या उद्दिष्टांतर्गत कोविड-१९ व म्युकरमायकोसीस या साथरोगाचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या संस्थांना आवश्यक असणा-या औषधी, सर्जिकल्स साहित्य व तद्नुषंगिक बाबींच्या खरेदीकरीता जुलै २०२१ च्या पावसाळी अधिवेशनात रु. १८०.०० कोटी एवढा निधी मंजूर करण्यात आला आहे. सदर पुरवणी मागणीद्वारे एकूण मंजूर निधीच्या अनुषंगाने शासनाने संदर्भ क्र. ४, ५ व ६ वरील शासन निर्णयान्वये अनुक्रमे रु. ९८.९३ कोटी, रु. ४५.७८ कोटी व रु. ३५.१३ कोटी एवढ्या रक्कमेची औषधे, सर्जिकल्स साहित्य, चाचणी किटस यांची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

सदर खरेदीचे आदेश, प्रशासकीय मान्यतेचे नग व मंजूरी दराप्रमाणे हाफकिन महामंडळाने एकूण रु. १५१.१० कोटी इतक्या रकमेचे प्रोफार्मा इन्व्हॉईस संचालनालयास सादर केलेले असून त्यांनी कोविड-१९ च्या प्रशासकीय मान्यतेनुसार कोणत्याही बाबीचे प्राफार्मा इनव्हॉईस त्यांच्याकडे

प्रलंबित नसल्याबाबत हाफकिन महामंड्ळाने दिनांक ३०.०३.२०२२ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. त्यावरुन सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात कोविड-१९ उपाययोजनांतर्गत संदर्भ क्र. ४, ५ व ६ वरील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या अनुक्रमे रु. ९८.९३ कोटी, रु. ४५.७८ कोटी व रु. ३५.१३ कोटी एवढ्या प्रशासकीय मान्यतेमधील रक्कमेमधून रु. २८.१६५२ कोटी एवढ्या रक्कमेची बचत होत असल्याने, उक्त बचतीच्या रक्कमेमधून संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या संस्थांना आवश्यक असणा-या औषधी, सर्जिकल्स साहित्य व तद्नुषंगिक बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात कोविड-१९ उपाययोजनांतर्गत संदर्भ क्र. ४, ५ व ६ वरील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या अनुक्रमे रु. ९८.९३ कोटी, रु. ४५.७८ कोटी व रु. ३५.१३ कोटी एवढ्या प्रशासकीय मान्यतेमधील रक्कमेमधून रु. २८.१६५२ कोटी एवढ्या रक्कमेच्या झालेल्या बचतीमधून संचालनालयाच्या संदर्भ क्र. ३ वरील दिनांक ३१.०३.२०२२ रोजीच्या पत्रासोबतच्या यादीमध्ये नमुद ३२ औषधी, सर्जिकल्स साहित्य व तद्नुषंगिक बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यासाठी रु. २८.१६५२ कोटी एवढ्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबींची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करतांना संदर्भ क्र. ४ दिनांक ३०.०७.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधीन राहून उक्त प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर औषधी, सर्जिकल्स साहित्य व अन्य बाबींची आवश्यकता, तसेच सदर खरेदी ही प्रचलित नियमानुसार आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांची राहील.

४. उपरोक्त बाबी खरेदीसाठी येणारा खर्च संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन मुंबई यांच्या पुढील लेखाशिर्षाखालीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक- एस-१

२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा

०१-संचालन व प्रशासन

(००) ( ०१) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.

(२२१० ३३१४)

२१- सामुग्री व पुरवठा

५. शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.१७८/प्रशासन-२, दि. ०६.०२.२०१५ सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये नमुद वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-४५, नियम क्रमांक-१६९ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये सदर शासन निर्गमित करण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११२३०५४७७३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2022.03.31 23:22:03 +05'30'

**(महादेव जोगदंड)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) ½, महाराष्ट्र, मुंबई.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. व्यवस्थापकिन संचालक, मे. हाफकिन महामंडळ, मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७. सर्व अधिष्ठाता/अधिक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय
८. निवडनस्ती (प्रशा-२)